मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेल्या आदेशानुसार रक्कम मा.न्यायालयात जमा करण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- पूरक-२०१९/प्र.क्र.१९६/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २९ जानेवारी, २०२०

**प्रस्तावना :-**

मा. जिल्हा न्यायालय, ठाणे यांच्याकडील दरखास्त क्रमांक २/२००३ व सिव्हील एम.ए.क्र.३१५/२०१५ मध्ये अनुक्रमे दिलेल्या निर्णयानुसार मोबदल्याची रक्कम मुल्यांकन तज्ञ, ठाणे यांनी हिशेबीत केलेली रक्कम रू.१,३३,५२,६९०/- मा. न्यायालयात जमा करण्यासाठी शासनाकडून अनुदान प्राप्त करावे याबाबत विनंती करण्यात आली होती. वरील निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे अपील दाखल करण्यात येऊन त्यामधील रिट पिटीशन क्र.५४४८/२०१६ मध्ये दि.०५.०७.२०१७ रोजी निर्णय होऊन मागील दि.३१.०८.२०१५ व दि.३०.०१.२०१६ रोजी भूसंदर्भ क्र.६/१९९९ मध्ये तसेच मिसलेनिअस ॲप्लीकेशन क्र.३१२/२०१५ मधील सर्व निर्णय रद्दबातल ठरविण्यात येऊन नव्याने मूल्यांकन सादर करण्याबाबत आदेश पारित करण्यात आले आहेत. त्यानुसार जिल्हा न्यायालयात सादर केलेला मूल्यांकन अहवाल विचारात घेऊन दि.२२.०४.२०१४ पर्यंत देय असलेली रू.१,०७,२१,०००/- इतकी रक्कम देण्याबाबत आदेशीत करण्यात आले आहे.

मौ. कारवली, ता. भिवंडी येथील खातेदार श्री. नरेश बाबू नाईक व इतर यांचे मालकी स.नं.१३२ पै व स.नं.१६३ मधील क्षेत्र ३१०० चौ.मी. माहे मे, १९८४ मध्ये उद्भवलेल्या जातीय दंगल ग्रस्तांचे पुनर्वसनासाठी तत्कालीन विशेष भूसंपादन अधिकारी, विशेष घटक ठाणे यांच्यामार्फत संपादीत करण्यात आली आहे. जाहीर निवाडयानुसार नुकसान भरपाई रक्कम प्रति. चौ.मी.३९०/- ठरविणेत आली होती. तथापि, संबंधित खातेदारांना निवाडयाची रक्कम मंजूर नसल्याने भूसंपादन अधिनियम १८९४ चे कलम १८ खाली खातेदारांनी मा. जिल्हा सत्र न्यायालय, ठाणे यांचेकडे जाहीर निवडयाविरूध्द अपिल दाखल केले होते. मा. जिल्हा न्यायालयाकडून जमिनीचा दर वाढवून प्रति चौ.मी. ७५३/- इतका निश्चित करण्यात आला होता. त्यानुसार नगर रचनाकार (वर्ग-१) मुल्यांकन तज्ञ, ठाणे यांनी रू.७३,७४,५८४/- एवढी रक्कम जमिन मालकांना संपादीत जमिनीच्या मोबदल्यामध्ये देय असल्याचे कळविले. तसेच मा. उच्च न्यायालयाने प्रथम अपिल क्र.८५०/२०१६ मध्ये सदरची रक्कम मा. न्यायालयाच्या निर्णयानंतर आठ आठवडयात कोर्टात जमा करण्याबाबत आदेश दिले आहेत.

सबब, मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार रू. १,८०,९६,०००/- (रूपये एक कोटी ऐंशी लक्ष शहाण्णऊ हजार फक्त) इतकी रक्कम मा.न्यायालयात जमा करून देण्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मा. जिल्हा न्यायालय, ठाणे यांच्याकडील दरखास्त क्रमांक २/२००३ व सिव्हील एम.ए.क्र.३१५/२०१५ मध्ये दिलेल्या निर्णयानुसार तसेच मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या अपीलामध्ये झालेल्या निर्णयानुसार दि.२२.०४.२०१४ पर्यंत देय असलेली रू.१,०७,२१,०००/- इतकी रक्कम. त्याचप्रमाणे मौ. कारवली, ता. भिवंडी येथील खातेदार श्री. नरेश बाबू नाईक व इतर यांचे मालकीची स.नं.१३२ पै व स.नं.१६३ मधील क्षेत्र ३१०० चौ.मी. माहे मे, १९८४ मध्ये उद्भवलेल्या जातीय दंगल ग्रस्तांचे पुनर्वसनासाठी तत्कालीन विशेष भूसंपादन अधिकारी, विशेष घटक ठाणे यांच्यामार्फत

संपादीत करण्यात आलेल्या जमिनीकरिता रू.७३,७४,५८४/- इतकी रक्कम अशी एकूण रू.१,८०,९६,०००/- इतकी रक्कम मा. उच्च न्यायालयात जमा करण्याकरिता याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च, “मागणी क्र.सी-५, मुख्य लेखाशीर्ष-२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ३१ सहायक अनुदाने, २००- इतर कार्यक्रम, (०१)(०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहचलेल्या व्यक्तींना सहाय्य (२२३५ २९३१) (भारित)(योजनेत्तर) या मुख्य लेखाशीर्षाखालील सन २०१९-२०२० मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. आहरण व संवितरण अधिकारी यांनी कोषागार/उपकोषागार यांचेकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये (Computer Slip) गौण/उपशिर्षाच्या गणकयंत्र संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश नियंत्रण अधिकाऱ्यांनी द्यावेत. सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर विभागीय आयुक्त, कोकण यांना वितरीत करण्यात येत आहे.

५. कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी. तसेच, खर्चाचा मेळ महालेखापाल यांनी नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालाच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे तात्काळ पाठवावे.

६. सदर प्रकरणी होणाऱ्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक वर्षाच्या अखेरपर्यंत न चुकता शासनास प्राप्त होईल, याची दक्षता विभागीय आयुक्त, कोकण यांनी घ्यावी.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२९१२४९१५६९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.01.29 12:28:24 +05'30'

**( सु. ह. उमराणीकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग
२) जिल्हाधिकारी, ठाणे
३) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) संचालक लेखा व कोषागरे, संगणक शाखा, मुंबई,
६) जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे
७) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-६), मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती (म-३ कार्यासन).